सन २०१६-२०१७ या शैक्षणिक वर्षापासून +२ स्तरावरील द्विलक्षी अभ्यासक्रमाच्या नवीन/ अधिकच्या तुकडयांना कायमस्वरूपी विनाअनुदान तत्वावर सुरू करण्यास मान्यता देणेबाबत..

# महाराष्ट्र शासन

## कौशल्य विकास व उद्योजकता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः : न्यायप्र-२०१६/प्र.क्र. २१/व्यशि-४,**

मंत्रालय विस्तार (खोली क्र.४३५ ), ४ था मजला
हुतात्मा राजगुरु चौक, मादामा कामा रोड, मुंबई - ४०० ०३२.
तारीख : १६ मार्च,२०१७

**संदर्भ :**

१) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक : ४/व्हीओसी/२२०३/२०१६-१७/३५ दिनांक २०/४/२०१६.

**प्रस्तावना :**

युवकभारती शिक्षण संस्था, पुलगाव, ता. देवळी, जि. वर्धा व्दारा संचलित लेबर कॅम्प हायस्कूल व विज्ञान कनिष्ठ महाविद्यालय, पुलगाव, ता. देवळी, जि. वर्धा या संस्थेने सन २०१५-१६ करीता व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमातंर्गत कॉम्प्युटर सायन्स - १ तुकडी करीता सादर केलेला प्रस्ताव जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, वर्धा यांचेमार्फत गठीत केलेल्या समितीने विद्युतभार कमी असल्यामुळे प्राथमिक स्तरावर नाकारलेला होता.

सदर संस्थेने विद्युतभारासंबंधी काढलेल्या त्रुटीच्या विरोधात मा. उच्च न्यायालय खंडपीठ, नागपूर येथे रिट याचिका क्रमांक ६४३७/२०१५ अन्वये याचिका दाखल केली होती. सदर याचिकेवर मा. उच्च न्यायालय, नागपूर यांनी दिनांक ९/२/२०१६ रोजी अंतिम आदेश पारित केले आहेत. सदर न्यायालयीन आदेशाच्या अनुषंगाने युवकभारती शिक्षण संस्था, पुलगाव, ता. देवळी, जि. वर्धा व्दारा संचलित लेबर कॅम्प हायस्कूल व विज्ञान कनिष्ठ महाविद्यालय, पुलगाव, ता. देवळी, जि. वर्धा या संस्थेस सन २०१६-१७ करीता व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमातंर्गत कॉम्प्युटर सायन्स - १ तुकडीस मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय:**

राज्यातील +२ स्तरावरील व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रम राबविणाऱ्या युवकभारती शिक्षण संस्था, पुलगाव, ता. देवळी, जि. वर्धा व्दारा संचलित लेबर कॅम्प हायस्कूल व विज्ञान कनिष्ठ महाविद्यालय, पुलगाव, ता. देवळी, जि. वर्धा यांना कायमस्वरूपी विनाअनुदानित तत्वावर कॉम्प्युटर सायन्स -१ तुकडीस शैक्षणिक वर्ष २०१६-१७ पासून सुरू करण्यास "सदर संस्थेच्या प्रस्तावात असलेल्या त्रूटी पुर्ततेच्या अधिन राहून" तसेच पुढील अटीं व शर्तीच्या अधिन राहून शासनाची मान्यता देण्यांत येत आहे.

**अटी व शर्ती.**

१. सबंधित संस्थेस माध्यमिक शाळा संहिता १९८१ मध्ये नमूद केलेल्या सर्व अटी व शर्तीची पूर्तता करणे बंधनकारक राहील.

२. मान्य अभ्यासक्रमांच्या नविन/अधिकच्या तुकडया सुरू करण्यास कायमस्वरूपी विनाअनुदानित तत्वावर मान्यता दिली असली तरीही, भविष्यात कोणत्याही प्रकारचे अनुदान अथवा आर्थिक मदत देण्यांत येणार नाही.

३. मान्य अभ्यासक्रम राबविणा-या संस्थांना शासन / संचालनालय / संचालनालयाच्या अखत्यारीतील संबंधित कार्यालये यांच्या कडून वेळोवेळी निर्गमित होणाऱ्या आदेशांचे पालन करणे बंधनकारक राहील.

४. शासनाने वेळोवेळी निश्चित केलेले शिक्षण शुल्क विद्यार्थ्यांकडून आकारणे संस्थेस बंधनकारक राहील.

५. **"कायमस्वरूपी विनाअनुदान तत्वावर मान्यता मिळालेले +२ स्तरावरील द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रम"** असा सूचना फलक संस्थांनी दर्शनी भागावर लावणे बंधनकारक राहील. सूचना फलकावर अभ्यासक्रमांच्या मंजूर तुकडयांची संख्या व मंजूर प्रवेश क्षमता याचा उल्लेख करण्यात यावा.

६. मान्यतेचे आदेश निर्गमित झाल्यानंतर, संबंधित संस्थेने मंजूर अभ्यासक्रमासाठी मानकानुसार आवश्यक असलेल्या सर्व पायाभूत सुविधा एक महिन्याच्या कालावधीमध्ये उपलब्ध करणे बंधनकारक राहील.

७. सदर अभ्यासक्रमांना कायमस्वरूपी विनाअनुदान तत्वावर मान्यता देण्यांत आल्यामुळे या अभ्यासक्रमाकरीता संस्थेने नियुक्त केलेल्या सर्व कर्मचारी वर्गाची सेवा / वेतन व तदनुषंगिक बाबींची जबाबदारी सर्वस्वी संबंधित संस्थेची राहील. याबाबत शासन कोणतीही जबाबदारी घेणार नाही.

८. मंजूर अभ्यासक्रमांकरीता आवश्यक कर्मचाऱ्यांच्या नियुक्त्या, त्यांची किमान शैक्षणिक अर्हता, अनुभव याबाबत संस्थेने महाराष्ट्र खाजगी शाळांतील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) नियमावली, १९८१ मधील तरतुदींनुसार तसेच शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार कार्यवाही करण्यांत यावी.

९. भविष्यात सदरचे अभ्यासक्रम बंद करण्याबाबत, किंवा त्यात काही बदल करण्याबाबत शासनाने निर्णय घेतल्यास तो विनाअट, विनाविलंब संस्थेने अंमलात आणणे आवश्यक राहील.

१०. अभ्यासक्रमांच्या मंजूर तुकडयांमधील प्रवेशाकरीता, शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले सामाजिक/ समांतर आरक्षण व इतर नियमांचे संस्थेने काटेकोरपणे पालन करावे व गुणानुक्रमे प्रवेश देण्यांत यावेत.

११. अभ्यासक्रमांना मंजूरी मिळाल्यानंतर सदर अभ्यासक्रम संस्थेत सुरू केल्याबाबतची माहिती संस्थेने महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक परिक्षा मंडळास तात्काळ द्यावी त्याबाबतची अनुषंगिक कार्यवाही करावी.

१२. मान्यता देण्यांत आलेल्या अभ्यासक्रमाच्या अधिकच्या/नविन तुकडयांची प्रवेश क्षमता प्रती तुकडी ५० असून, शैक्षणिक वर्ष २०१६-२०१७ मध्ये मंजूर प्रवेश क्षमतेच्या ५०% पेक्षा कमी प्रवेश झाल्यास अशा तुकडया सुरू ठेवण्याकरीता संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व

प्रशिक्षण अधिका-यांची परवानगी घेणे आवश्यक राहील. त्याचप्रमाणे सलग तीन शैक्षणिक वर्षांमध्ये मंजूर प्रवेश क्षमतेच्या ५०% पेक्षा कमी प्रवेश झाल्यास सदर अभ्यासक्रमाची तुकडी बंद करण्याची कार्यवाही करण्यांत येईल.

१३. संबंधित संस्थेने त्यांच्याकडे भाषा/जीवशास्त्र इत्यादी विषयांचे शिक्षक आता मंजूर केलेल्या व्दिलक्षी अभ्यासक्रमाच्या तुकडीमुळे अतिरीक्त ठरणार नाहीत याची खातरजमा करुनच विद्यार्थ्यांना प्रवेश दयावा.

१४. शैक्षणिक गुणवत्ता वाढविण्यासाठी उपरोक्त अटी व शर्तीमध्ये बदल करण्याचे किंवा नवीन अटी व शर्ती अंतर्भूत करण्याचे अधिकार शासनाचे राहतील.

१५. **+२ स्तरावरील व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमाच्या तुकडयांमध्ये विद्यार्थ्यांना प्रवेश देण्यापूर्वी संचालक (व्यवसाय शिक्षण) यांचेकडून स्थानिक स्तरावर समिती नेमुन समितीच्या सर्वकष निरीक्षणानुसार प्राप्त अहवालाप्रमाणे संचालनालयाच्या परवानगीने प्रवेश देण्यात यावेत. तद्नंतर सर्व संबंधित संस्थाकडून शासनाने विहित केलेल्या सर्व निकष व अटी/शर्तीची पुर्तता होत असल्याबाबत संचालक (व्यवसाय शिक्षण) यांच्याकडून सातत्याने आढावा घेण्यात यावा.**

१६. व्यवसाय अभ्यासक्रमांतर्गत मंजूर व्यवसाय अभ्यासक्रमाच्या मंजूर तुकडीनुसार प्रवेश क्षमतेपेक्षा अतिरिक्त अनधिकृत प्रवेश केल्यास शासनाने सन २०१३ या महाराष्ट्र अधिनियम क्रमांक २० राजपत्र दि. २१/८/२०१३ अन्वये प्रसिध्द झालेल्या अधिनियमान्वये अनधिकृत संस्था स्थापन करण्यास अथवा अनधिकृत पाठ्यक्रम सुरू करण्यास मनाई करण्यात आली आहे.

शैक्षणिक वर्ष २०१६-२०१७ मध्ये मान्यता दिलेल्या उपरोक्त संस्थेने व्यवसाय अभ्यासक्रम सुरु केले किंवा कसे? तसेच अभ्यासक्रम निहाय प्रवेशित विद्यार्थी संख्या याबाबतची माहिती संचालक, (व्यशि व प्रशि) यांनी शासनास दिनांक ३१/३/२०१७ पर्यंत सादर करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक क्र. २०१७०३१६१४३५०२१४०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kailas Laxman Dhakane

Digitally signed by Kailas Laxman Dhakane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SD and ED, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6283d0b58cf739d67ca64d094986494b972b39cf4df46464c9bd30ae8293d9de, cn=Kailas Laxman Dhakane
Date: 2017.03.20 16:01:22 +05'30'

**(कैलास ढाकणे)**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. मंत्री (कौ.वि.व उ.) यांचे खाजगी सचिव यांना माहितीसाठी सादर.

२) मा. राज्यमंत्री (कौ.वि.व उ.) यांचे खाजगी सचिव यांना माहितीसाठी सादर.

३) मा. प्रधान सचिव, कौशल्य विकास व उद्याजकता विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.

४) मा.प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग यांचे स्वीय सहायक.

५) उप सचिव (व्यशि), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांचे स्वीय सहायक.

६) संचालक (व्यवसाय शिक्षण प्रशिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य मुंबई-१

७) विभागीय शिक्षण उपसंचालक,(शालेय शिक्षण विभाग), नागपूर (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालया मार्फत)

८) सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, नागपूर (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालया मार्फत.)

९) संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालया मार्फत.)

१०) संबंधित अशासकीय संस्था (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालया मार्फत.)

११) निवड नस्ती (व्यशि-४)